# ज्ञान ही मोठीच संपत्ती आहे

इब्ने इन्शा

(मराठी : सुजाता गोडबोले)

ज्ञान ही मोठीच संपत्ती आहे.

तू पण शाळा काढ.

ज्ञान दे.

फी घे.

पैसे मिळव.

पैसेच पैसे.

शिकवायचे वीस.

बसचे तीस.

गणवेशाचे चाळीस.

खेळाचे वेगळे.

करमणुकीचे निराळे.

सहलीचे आणखी वेगळे.

लोकांच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नकोस.

पैसे मिळव.

त्यातून आणखी शाळा काढ.

आणखी पैसे मिळव.

असेच पैसे मिळवत रहा.

तू तर अजून तरूण आहेस.

हे काम चालूच ठेव.

जोपर्यंत गंगा- यमुना वहात आहेत

तोपर्यंत शिकवणं चांगलंच आहे.

खूप वाच.

जमाखर्चाच्या वह्या वाच.

टेलिफोनची डिरेक्टरी वाच.

बँकेची कागदपत्रे वाच.

वधू-वरांच्या जाहिराती वाच.

इतर काही मात्र वाचू नकोस.

मीर आणि गालिब वाचू नकोस.

इक्बाल आणि फैझ वाचू नकोस.

इब्ने इन्शाचंही काहीच वाचू नकोस.

नाही तर तू त्यातच अडकशील.

आणि त्या परिणामांची जबाबदारी

आमच्यापैकी कोणीच घेणार नाही.

(पाकिस्तानातील प्रसिद्ध कवी इब्ने इन्शा यांनी ही कविता १९७० मध्ये लिहिली. शिक्षणाच्या बाजारीकरणावर यात टीका केली आहे.)